**पंढरपूर (जि. सोलापूर) विकास प्राधिकरण अधिसूचित क्षेत्रासाठी विकास योजना तयार करण्यासाठी नगर रचनाकार, विकास योजना, विशेष घटक, सोलापूर महानगरपालिका जि. सोलापूर हे कार्यालय, पंढरपूर विकास प्राधिकरण, सोलापूर, जि. सोलापूर यांचेकडे स्थलांतरित करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र.टिपीव्ही-२३१४/३५४/प्र.क्र.७१/नवि-२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
चौथा मजला, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- २६ फेब्रुवारी, २०१५.

**संदर्भ :-** १. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.टिपीव्ही-२१०९/ ९/ प्र.क्र.१४५/ ०९/ नवि-२७, दि.१० सप्टेंबर, २००९.
२. पंढरपूर विकास प्राधिकरण, सोलापूर यांचे पत्र क्र.पंढरपूर विकास प्राधिकरण/३४५०, दि.२०.१२.२०१३.
३. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.वियोविघ/पंढरपूर/अर्थसंकल्प/२२६१, दि.२९.०४.२०१४.

**प्रस्तावना :-**

जुळे सोलापूर भाग-१, विजापूर रोड व होटगी रोड दरम्यान परिसराची सुधारित विकास योजना व जुळे सोलापूर भाग-२, हैद्राबाद रोडच्या दक्षिणेकडील विडी घरकुल व लगतच्या परिसराची मूळ विकास योजना तयार करण्यासाठी नगर विकास विभागाच्या संदर्भ-१ येथील शासन निर्णयान्वये नगर रचनाकार, विकास योजना विशेष घटक, सोलापूर महानगरपालिका, सोलापूर येथे विकास योजना विशेष घटकाची स्थापना करण्यात आली होती. जूळे सोलापूर येथील वर नमूद परिसराचा सुधारित विकास आराखडा तयार करण्याचे काम जवळपास पूर्ण झाले असून अहवाल शासनास करण्याच्या स्थितीत आहे. सद्य:स्थितीत या विकास योजना विशेष घटकाकडे कोणतेही काम शिल्लक नाही. तसेच पंढरपूर विकास प्राधिकरण, सोलापूर यांनी त्यांच्या संदर्भ-२ येथील पत्रान्वये पंढरपूर विकास प्राधिकरणामध्ये पंढरपूर नगरपरिषद हद्दीपासून बाहेर सुमारे १० कि. मि. परिघातील ४१ गांवामधील सुमारे ५०० चौ. कि.मि. परिसरात विकास योजना तयार करण्यासाठी विकास योजना विशेष घटक मंजूर करण्याबाबत प्रस्ताव सादर केलेला आहे. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, पुणे यांनी त्यांच्या संदर्भाधीन-३ येथील दि.२९.०४.२०१४ च्या पत्रान्वये उक्त प्रस्तावास शासन मान्यता देण्याबाबत प्रस्तावाची शिफारस करुन पंढरपूर विकास प्राधिकरण, सोलापूर करिता विकास योजना विशेष घटक मंजूर करण्याची विनंती केलेली आहे. या बाबी विचारात घेता पंढरपूर विकास प्राधिकरण अधिसूचित क्षेत्रासाठी विकास योजना तयार करण्यासाठी नगर रचनाकार, विकास

योजना विशेष घटक, जुळे सोलापूर हे कार्यालय पंढरपूर विकास प्राधिकरण स्थलातंरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासन पुढीलप्रमाणे आदेश देत आहे :-

**शासन निर्णय :-**

पंढरपूर विकास प्राधिकरणामध्ये पंढरपूर नगरपरिषद हद्दीपासून बाहेर सुमारे १० कि.मि. परिघातील ४१ गांवामधील सुमारे ५०० चौ. कि.मि. परिसरात विकास योजना तयार करण्यासाठी व अनुषंगिक तांत्रिक कामे करणे याकरिता सोलापूर महानगरपालिका, सोलापूर येथे कार्यरत असलेले नगर रचनाकार, विकास योजना विशेष घटक, जूळे सोलापूर यांचे कार्यालय पुढील तक्त्यात नमूद केलेल्या ०७ पदांसह पंढरपूर विकास प्राधिकरण विकास योजना तयार करण्यासाठी **दि.०१ मार्च, २०१५ (म.पू.)** पासून पंढरपूर विकास प्राधिकरण, सोलापूर येथे स्थलातंरित करण्यास या आदेशान्वये शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

| अ. क्र. | पदांचे नांव | वेतनश्रेणी (रुपयात) | ग्रेड वेतन रुपयात | एकूण पदे | स्थाय / अस्थायी |
|---|---|---|---|---|---|
| १ | नगर रचनाकार (राजपत्रित गट-अ) | रु.१५,६००-३९,१००. | ५,४०० | १ | अस्थायी |
| २ | सहाय्यक नगर रचनाकार | रु.९,३००-३४,८००. | ४,४०० | १ | अस्थायी |
| ३ | रचना सहायक | (i) रु.९,३००-३४,८००<br>(ii) रु.९,३००-३४,८००<br>(५ वर्षाच्या अर्हताकारी सेवेनंतर सहाय्यक नगर रचनाकार) | ४,३००<br>४,४०० | २ | अस्थायी |
| ४ | कनिष्ठ आरेखक | (i) रु.५,२००-२०,२००.<br>(ii) रु.९,३००-३४,८००<br>(५ वर्षाच्या र्हताकारी सेवेनंतर) | २,४००<br>४,२०० | १ | अस्थायी |
| ९ | अनुरेखक | (i) रु.५,२००-२०,२००.<br>(ii) रु.५,२००-२०,२००<br>(७ वर्षाच्या अर्हताकारी सेवेनंतर) | २,०००<br>२,४०० | २ | अस्थायी |
| | | | **एकूण :-** | **०७** | |

**०२.** पंढरपूर विकास प्राधिकरण अधिनियम, २००९ (सन २००९ चा महाराष्ट्र अधिनियम क्र.१५) अनुसार नगर विकास विभाग शासन पत्र दि.२४.०८.२००९ च्या अधिसूचनेन्वये पंढरपूर विकास प्राधिकरणाची स्थापना करण्यात आली आहे. महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ चे कलम ४० मधील तरतुदीनुसार नगर विकास विभाग, शासन निर्णय दि.२५.०८.२०१० अन्वये उक्त

प्राधिकरणास "विशेष नियोजन प्राधिकरण" म्हणून मान्यता देण्यात आली आहे. पंढरपूर विकास प्राधिकरण यांनी त्यांच्या संदर्भ-२ येथील पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार प्रस्तावित विकास योजना विशेष घटकाकरिता वेतन व भत्ते, कार्यालयास जागा, वाहन, दूरध्वनी, संगणक, स्टेशनरी, फर्निचर इत्यादी बाबींवरील खर्च पंढरपूर विकास प्राधिकरण, सोलापूर यांच्या निधीमधून (Funds) करण्यात यावा.

**०३.** नगर रचनाकार, पंढरपूर विकास प्राधिकरण, सोलापूर विकास योजना विशेष घटक, सोलापूर या कार्यालयातील उपरोक्त अस्थायी पदांची मुदतवाढ पूर्वी मान्यता देण्यात आल्यानुसार दि.२८.०२.२०१५ पर्यंत चालू राहील. तसेच सदरची अस्थायी पदे दि.०१.०३.२०१५ ते दि.२८.०२.२०१६ या कालावधीत पुढे सुरु ठेवण्याकरिता मुदतवाढ देण्याबाबतची कार्यवाही शासनस्तरावरुन करण्यात येत आहे.

**०४.** नगर रचनाकार, विकास योजना विशेष घटक, जुळे सोलापूर यांचे कार्यालय, पंढरपूर विकास प्राधिकरण, सोलापूर व्दारा जिल्हाधिकारी, सोलापूर यांच्या कार्यालयाकडे वर्ग करण्याची कार्यवाही संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांच्या स्तरावर तात्काळ करावी. तसेच, सध्या या विकास योजना विशेष घटकासाठी मंजूर असलेल्या ०७ पदांपैकी रिक्त असलेल्या पदांवर अधिकारी / कर्मचारी उपलब्ध करुन देण्याबाबत संचालनालयाच्या स्तरावर कार्यवाही करण्यात यावी.

**०५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२२६१६३१२५०१२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Siddharam Karbasayya Salimath

Digitally signed by Siddharam Karbasayya Salimath
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Siddharam Karbasayya Salimath
Date: 2015.02.26 16:41:54 +05'30'

**(सिध्दाराम सालीमठ)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.
२. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
३. जिल्हाधिकारी, सोलापूर.
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, पंढरपूर विकास प्राधिकरण, सोलापूर, जि. सोलापूर.

५. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण, महाराष्ट्र राज्य, पुणे. **(पाच प्रतीसह).**
६. संचालक, नगर रचना व सह सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. सह संचालक, नगर रचना, पुणे विभाग, पुणे.
८. नगर रचनाकार, विशेष योजना विशेष घटक, जुळे सोलापूर, सोलापूर महानगरपालिका, सोलापूर.
९. नगर रचनाकार, विशेष योजना विशेष घटक, पंढरपूर विकास प्राधिकरण, सोलापूर व्दारा जिल्हाधिकारी, सोलापूर.
१०.जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर.
११.कक्ष अधिकारी (नवि-४ / नवि-१३), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.निवडनस्ती / नवि-२७.

*****